ई-निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची निविदा सूचना प्रसिद्ध करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

शासन आदेश क्रमांकः निविदा-२०२१/प्र.क्र.१३/बांध-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख : २२ फेब्रुवारी, २०२३

**वाचा :**

१. **शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांकः** संकीर्ण २०१०/ प्र.क्र.१७२/पंरा-७, दिनांक १९ ऑक्टोबर, २०११.
२. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** निविदा २०१२/प्र.क्र.९७/पंरा-७, दिनांक २३ सप्टेंबर, २०१३.
३. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः**निविदा २०१६/प्र.क्र.१९५/पंरा-७, दिनांक २६ जुलै, २०१६.
४. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक १३ जानेवारी, २०२१.
५. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक ०८ एप्रिल, २०२१.
६. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक ०९ जून, २०२१.
७. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक १० ऑगस्ट, २०२१.
८. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक २९ ऑक्टोबर, २०२१.
९. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक ०८ डिसेंबर, २०२१.
१०.**शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक ३ फेब्रुवारी, २०२२.
११.**शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक २८ जून, २०२२.
१२.**शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक १९ डिसेंबर, २०२२.
१३. **शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक :** संकिर्ण-२०२२/प्र. क्र. १०४/इमा-२, दिनांक ८ फेब्रुवारी, २०२३.

**शासन आदेश :**

दिनांक ०१ जानेवारी, २०१२ पासून पंचायत राज संस्थांमध्ये विविध विकासात्मक कामे व विकास कामांसाठी लागणाऱ्या सेवा तथा वस्तुंची खरेदी यासाठी ई-निविदा कार्यप्रणालीचा अवलंब करणे संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये बंधनकारक करण्यात आले आहे. ई-

निविदा प्रणाली अंतर्गत सुधारित कार्यपद्धती व निविदा सूचनेचा कालावधी संदर्भ क्रमांक २ व ३ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आला आहे. पंचायत राज संस्थांतर्गत रस्त्यांची कामे व पुलाच्या दुरूस्तीची कामे, (महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था अंतर्गत प्रधानमंत्री व मुख्यमंत्री ग्राम सडक योजनेमधील कामे वगळून) जिल्हा परिषद स्वीय निधी, तीर्थक्षेत्र, २५१५ मुलभुत सुविधा तसेच अन्य लोकहिताची विविध विकास कामे त्वरेने मार्गी लागण्याच्या दृष्टीने तसेच सन २०२२-२३ मध्ये ज्या ठिकाणी जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायतीच्या निवडणुका होण्याची शक्यता विचारात घेऊन ग्राम विकास विभागाच्या उक्त संदर्भाधीन दिनांक २३ सप्टेंबर, २०१३ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-४ (२) व दिनांक २६ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मध्ये सदर निविदा बोलाविण्यासाठी निर्धारित केलेला कालावधी, उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १२ येथील दिनांक १९ डिसेंबर, २०२२ रोजीच्या परिपत्रकान्वये, कामांच्या निविदेच्या किंमतीनुसार, अल्प कालावधी निश्चित करून दिनांक ३१ जानेवारी, २०२३ पर्यंत मंजुरी देण्यात आलेली आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाने संदर्भिय क्र. १३ येथील शासन निर्णयानुसार सन २०२२-२३ मध्ये महानगरपालिका/नगरपालिका, नगरपंचायत, ग्रामपंचायत, जिल्हा परिषद निवडणुका होणार आहे अशा ठिकाणी आचार संहिता विचारात घेऊन ई - निविदा प्रसिद्ध करण्याचा कालावधी निश्चित केला आहे. हि बाब विचारात घेता ग्राम विकास विभागासाठी ई - निविदा प्रसिद्ध कालावधी निश्चित करण्याची बाब विचाराधीन होती.

**०२.** त्यास अनुसरून उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १२ येथील दिनांक १९ डिसेंबर, २०२२ रोजीच्या परिपत्रकातील, ई-निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची ई - निविदा सूचना प्रसिध्द करण्याचा कालावधी दिनांक ३१ मार्च, २०२३ पर्यंत खालीलप्रमाणे राहिल.

| अ.क्र. | कामाच्या निविदेची किंमत | निविदा सूचना क्रमांक व कालावधी | | |
|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय |
| १ | रू.५.०० लक्ष पेक्षा कमी किंमतीची कामे | ७ दिवस | ४ दिवस | ३ दिवस |
| २ | रू.५.०० ते ५०.०० लक्ष पर्यंतची कामे | ७ दिवस | ५ दिवस | ३ दिवस |
| ३ | रू.५०.०० लक्ष पेक्षा अधिक किंमतीची कामे | ७ दिवस | ५ दिवस | ३ दिवस |

**०३.** सदर आदेश सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व खाते प्रमुख तसेच लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण मुलभूत सुविधा पुरविणे (२५१५ १२३८) या अंतर्गतची कामे ज्या ठिकाणी सार्वजनिक बांधकाम मंडळ यांच्या अधिनस्त यंत्रणा कार्यरत असेल अशा यंत्रणांच्या निदर्शनास आणून उपरोल्लेखित कामे मुदतीत पुर्ण होतील याची दक्षता घ्यावी. दिनांक ०१ एप्रिल, २०२३ पासून वरील सवलत आपोआप रद्द होऊन, संदर्भीय शासन निर्णय दिनांक २३ सप्टेंबर, २०१३ व दिनांक २६ जुलै, २०१६ मधील या संदर्भातील तरतूदी पुन:श्च लागू होतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२२१३०४५३४४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.02.22 14:57:08 +05'30'

**(प्र. वि. पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
३. मा.सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मा.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, सर्व विभाग.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
७. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
८. सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यंत्रणा.
९. सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा.
१०. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
११. कार्यकारी अभियंता (बांधकाम, लघुपाटबंधारे, पाणी पुरवठा विभाग), जिल्हा परिषद, सर्व.
१२. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यंत्रणा.
१३. गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सर्व.
१४. ग्राम विकास विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
१५. निवडनस्ती कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.